राज्यातील अल्पसंख्याक बहुल नागरी क्षेत्रात क्षेत्रविकास कार्यक्रम राबविण्यासाठी अनुदान वितरित करण्यास मंजुरी बाबत सन २०२१-२२.

**महाराष्ट्र शासन**
**अल्पसंख्यांक विकास विभाग,**
**शासन निर्णय क्रमांक :** नाक्षेवि -२०२१/प्र.क्र. ८१ /का.९,
**मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.**
**दि. ३१ मार्च,२०२२**

**संदर्भ** :- १) शासन निर्णय, अल्पसंख्याक विकास विभाग, क्षेविका-२०१५/प्र.क्र.७६/का.९, दि. १८ जून, २०१५.
२) शासन पूरकपत्र, अल्पसंख्याक विकास विभाग, क्षेविका-२०१५/प्र.क्र.५/का.९, दि. ९ मार्च, २०१६.
३) शासन निर्णय, वित्त विभाग, क्र. अर्थसं - २०२१/ प्र.क्र.४८/अर्थ-३, दि. २४,जून २०२१.
४) शासन निर्णय, वित्त विभाग, क्र. अर्थसं - २०२१/ प्र.क्र.४८/अर्थ-३, दि. २९,जुलै २०२१.
५) शासन निर्णय, वित्त विभाग, क्र. अर्थसं - २०२१/ प्र.क्र.४८/अर्थ-३, दि. १४,ऑक्टोबर २०२१.
६) शासन निर्णय, अल्पसंख्याक विकास विभाग, क्र. नाक्षेवि -२०२१/प्र.क्र. ८१ /का.९, दि.२१ जानेवारी,२०२२.

**प्रस्तावना :-**

अल्पसंख्याक विकास विभागाने सन २००८-०९ या वर्षापासून राज्यातील अल्पसंख्याक बहुल नागरी क्षेत्रांकरिता क्षेत्रविकास कार्यक्रम कार्यान्वित केला असून उपरोक्त संदर्भ क्र.१ येथील शासन निर्णयान्वये ही योजना सन २०१५-१६ या वर्षात राबविण्यास मंजुरी देण्यात आली आहे. तसेच संदर्भ क्र.२ येथील शासन पूरकपत्रान्वये, दि.१८जून,२०१५ रोजीच्या शासन निर्णयातील योजनेची कार्यपध्दती या शीर्षाखाली परिच्छेद (ब) (iii) च्या पुढे परिच्छेद दाखल करण्याचा निर्णय शासन मान्यतेने घेतला आहे. त्यानुसार मा.खासदार, मा.आमदार व अन्य मा.लोकप्रतिनिधी यांच्या प्रस्तावांना महानगरपालिका/ नगरपालिका/ नगरपंचायत हद्दीमध्ये कामाच्या संख्येची मर्यादा एकापेक्षा जास्त परंतू प्रति काम प्रति वर्षी महानगरपालिकेस कमाल रु. ४० लक्ष, "अ" वर्ग नगरपालिकेस कमाल रु. ३० लक्ष, “ब” व रु.२० लक्ष "क" वर्ग नगर पंचायतींना असू शकेल, अशी तरतूद आहे. मा. खासदार व आमदार व जिल्हाधिकारी यांच्याकडून महानगरपालिका/ नगरपालिका/ नगरपंचायत/ म्हाडा/ सार्वजनिक बांधकाम विभाग यांच्याकडून प्राप्त प्रस्तावांना मंजूरी देऊन सन २०२१-२२ या आर्थिक वर्षात अर्थसंकल्पीय निधीचे उर्वरित अनुदान आणि पुरवणी मागणीद्वारे उपलब्ध तरतूदीपैकी निधी वितरीत करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय :-**

राज्यातील अल्पसंख्याक बहुल नागरी क्षेत्र विकास योजनेकरिता सन २०२१-२२ या आर्थिक वर्षात रु.५०,४०,००,०००/- (अक्षरी रू. पन्नास कोटी चाळीस लक्ष फक्त) एवढा निधी अर्थसंकल्पित करण्यात आला आहे. वित्त विभाग शासन निर्णय दि.२४/०६/२०२१ मधील मार्गदर्शक सूचनांनुसार सन २०२१-२२

या आर्थिक वर्षात या योजनेकरिता अर्थसंकल्पित रु.५०,४०,००,०००/- (अक्षरी रू. पन्नास कोटी चाळीस लक्ष फक्त) निधीपैकी ३०% च्या मर्यादेत वित्त विभागाने उपलब्ध करुन दिलेल्या रु.१५,४०,००,०००/- (अक्षरी रुपये पंधरा कोटी चाळीस लक्ष फक्त) इतका निधी दि.२१/०१/२०२२च्या शासन निर्णयान्वये वितरीत करण्यात आला आहे.

वित्त विभागाने सन २०२१-२२ च्या अर्थसंकल्पीत निधीच्या शिल्लक निधी रु. ३५,००,००,०००/- (अक्षरी रूपये पस्तीस कोटी फक्त) आणि पुरवणी मागणीद्वारे उपलब्ध केलेले अनुदानातून उर्वरित एकूण रु. १००,००,००,०००/- ( अक्षरी रुपये शंभर कोटी फक्त ) असे **एकूण रु.१३५,००,००,०००/- (अक्षरी रुपये एकशे पस्तीस कोटी फक्त)** इतका निधी (BEAMS) बीम्स प्रणालीवर वितरणासाठी उपलब्ध करुन दिला आहे.

२. सन २०२१-२२च्या अर्थसंकल्पीत उपलब्ध तरतूदीपैकी अनुदान वितरीत करण्यासाठी शासनाची मान्यता प्राप्त झालेली आहे. त्यानुसार मा.मंत्री/ राज्यमंत्री/ खासदार/ आमदार तसेच जिल्हाधिकारी यांच्याकडून शासनास प्राप्त झालेल्या महानगरपालिका/ नगरपालिका/ नगरपंचायत हद्दीमध्ये विकास कामांच्या प्रस्तावांना शासन मान्यता प्राप्त झाली असून या शासन निर्णयासोबतच्या **परिशिष्ट-"अ"** मध्ये दर्शविल्याप्रमाणे **एकूण रु.१३५,००,००,०००/- (अक्षरी रुपये एकशे पस्तीस कोटी फक्त)** एवढा निधी मंजूर करण्यात येत आहे. सदर निधी संबधित महानगरपालिका/ म्हाडा/ नगरपालिका/ नगर पंचायत/ सार्वजनिक बांधकाम विभाग ज्या जिल्हयांमध्ये स्थित आहेत, त्या जिल्हयांचे जिल्हाधिकारी, यांना स्वाधीन करण्यात येत आहे.

३. संबंधित महानगरपालिका/ म्हाडा/ नगरपालिका/ नगरपंचायतीं/ सार्वजनिक बांधकाम विभागांना मंजूर करण्यात आलेले अनुदान वितरित करण्यासाठी संबंधित जिल्हाधिकारी, नियंत्रक अधिकारी आणि आहरण व संवितरण अधिकारी म्हणून काम पाहतील. **परिशिष्ट -"अ"** मध्ये दर्शविलेली कामे इतर योजनेतून करण्यात आलेली नाहीत, याची शहानिशा व खातरजमा संबधित जिल्हाधिकारी यांनी करावी व जर सदर काम इतर योजनेतून मंजूर केले असल्यास, त्या बदल्यात सदर योजनेतील इतर काम मंजूर निधीच्या मर्यादेत राहून बदल करण्याचे अधिकार संबंधित जिल्ह्याचे जिल्हाधिकारी यांना राहतील. उपरोक्त कामाच्या बदल्यात सदर योजनेतील इतर काम करणे शक्य नसल्यास त्यासाठी वितरीत केलेला निधी शासनाच्या कोषागारात तात्काळ जमा करण्यात यावा. तसेच संबंधित जिल्हाधिकारी यांनी उपरोक्त कामांचे अंदाजपत्रक बांधकाम विभागाकडून प्राप्त करून घ्यावे. याबाबतची सर्व कागदपत्रे शासन निर्णयातील अटी व शर्तीनुसार प्राप्त करून घेण्याची कार्यवाही संबधित जिल्हाधिकारी यांनी करावी. त्यानंतर त्यांना प्रशासकीय व वित्तीय मान्यता देण्यात यावी व निधी संबंधित महानगरपालिका/ म्हाडा/ नगरपालिका/नगरपंचायत/सार्वजनिक बांधकाम विभाग यांना सुपूर्द करण्यात यावा. तसेच सदर कामे महानगरपालिका/ म्हाडा/ नगरपालिका/ नगरपंचायतीच्यां बांधकाम विभागामार्फत रितसर करुन घेण्यात यावीत.

४. राज्यातील महानगरपालिका /नगरपालिका/नगरपंचायतींनी मागणी केल्यानुसार ज्या विवक्षित प्रयोजनासाठी निधि मंजूर करण्यात आला आहे, केवळ त्याच प्रयोजनासाठी संबंधित महानगरपालिका/ नगरपालिका/ नगरपंचायतींना निधी खर्ची टाकणे अनिवार्य आहे. संबधित जिल्हाधिकाऱ्यांकडून अनुदान वितरित करण्यात आल्यानंतर संबंधित महानगरपालिका/ म्हाडा/ नगरपालिका/ नगरपंचायतीं/ सार्वजनिक बांधकाम विभाग यांना सहा महिन्यांच्या कालावधीत प्रस्तावात नमूद केलेली कामे पूर्ण करणे

आवश्यक आहे व याबाबतची उपयोगिता प्रमाणपत्रे या शासन निर्णयाच्या **परिशिष्ट "ब"** मध्ये विहित केलेल्या नमुन्यात जिल्हाधिकाऱ्यांनी अल्पसंख्याक विकास विभागाकडे सादर करणे आवश्यक आहे. अल्पसंख्याक नागरी क्षेत्रविकास कार्यक्रमांतर्गत राज्यातील महानगरपालिका/म्हाडा/ नगरपालिका/ नगरपंचायतीं/सार्वजनिक बांधकाम विभाग यांनी हाती घेतलेल्या विकासकामांच्या प्रगतीबाबत संनियंत्रण करुन त्याबाबतचा अहवाल संबंधित जिल्हाधिकारी यांनी शासनास सादर करावा.

५. या योजनेंतर्गत होणारा खर्च " मागणी क्र. झेडई-१, मुख्यलेखाशिर्ष २२३५, सामाजिक सुरक्षा व कल्याण ०२ समाजकल्याण २०० इतर कार्यक्रम, राज्य योजनांतर्गत योजना (०१) (०७) अल्पसंख्याक बहुल क्षेत्रात क्षेत्रविकास योजनेकरिता सहायक अनुदान (कार्यक्रम) (२२३५-ए-१३१) ३१ सहायक अनुदाने (वेतनेतर)" या लेखाशिर्षाखाली सन २०२१-२२ या वर्षाकरिता मंजूर करण्यात आलेल्या अनुदानातून भागविण्यात यावा.

६. “शासन निर्णय वित्तीय अधिकार नियम पुस्तिका -१९७८ भाग पहिला, वित्त विभाग, शासन निर्णय क्र. विअप्र-२०१३/प्र.क्र.३०/२०१३/विनियम, दि.१७ एप्रिल, २०१५ अन्वये प्रशासकीय विभागास प्राप्त झालेल्या अधिकारांतर्गत प्रदान करण्यात आलेल्या अधिकारानुसार तसेच उपरोक्त संदर्भ क्र. ३, ४ व ५ येथील वित्त विभागाच्या शासन निर्णय व त्यासोबतच्या परिशिष्टामधील मार्गदर्शक सूचनांचे काटेकोरपणे पालन करण्यात यावे. सदर शासन निर्णय वित्त विभागाचा अनौपचारिक संदर्भ क्रं.८८/२०२२/व्यय-१, दि.१७/०३/२०२२ अन्वये प्राप्त मान्यतेनुसार निर्गमित करण्यात येत आहे.”

हा शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध असून त्याचा संगणक संकेतांक २०२२०३३१११३२४६५३१४ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने,

DINESH MADHAVRAO SONAVANE

Digitally signed by DINESH MADHAVRAO SONAVANE
DN: CN = DINESH MADHAVRAO SONAVANE, C = IN, S = Maharashtra, O = GOVERNMENT OF MAHARASHTRA, OU = MINORITY DEVELOPMENT DEPARTMENT
Date: 2022.03.31 17:04:14 +05'30'

**(दि. मा. सोनवणे)**
**उप सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रति,**

१. मा.राज्यपालांचे सचिव,
२. मा.मुख्यमंत्र्यांचे प्रधान सचिव,
३. मा.मुख्य सचिव, महाराष्ट्र शासन,
४. अपर मुख्य सचिव/ प्रधान सचिव / सचिव सर्व मंत्रालयीन विभाग,
५. महालेखापाल १/२ (लेखा व अनुज्ञेयता), मुंबई / नागपूर,
६. महालेखापाल १/२ (लेखापरीक्षा) , मुंबई / नागपूर,
७. अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई,
८. निवासी लेखा परीक्षा अधिकारी, मुंबई,
९. संबंधित विभागीय आयुक्त,
१०.आयुक्त, नगरपालिका प्रशासन, मुंबई,
११.संबंधित जिल्हाधिकारी,

१२.आयुक्त, संबंधित महानगरपालिका,
१३.मुख्याधिकारी,  संबंधित नगरपालिका,
१४.मा.मंत्री / मा.राज्यमंत्री (अल्पसंख्याक विकास) यांचे खाजगी सचिव,
१५.सचिव, महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालय, विधान भवन, मुंबई,
१६.महासंचालक, माहिती व जनसंपर्क महासंचालनालय (प्रसिध्दीसाठी),
१७.निवडनस्ती ( का-९)

**शासन निर्णय अल्पसंख्याक विकास विभाग क्र.नाक्षेवि-२०२१/प्र.क्र.८१/का-९,**
**दिनांक-३१ मार्च, २०२२**
**परिशिष्ट "अ"**

| अ.क्र. | जिल्हा | म. न.पा./न.पा./न.प. | क्र. | कामाचे नाव / स्वरुप | मंजूर निधी (रुपये लाखात) |
|---|---|---|---|---|---|
| १ | अमरावती | अमरावती | १ | उस्मान नगर, बिस्मील्ला नगर येथील गल्ली नं.२ युसुफ भाई यांचे घरापासुन ते रहेमत भाई यांच्या घरापर्यंत रस्त्यांचे डांबरीकरण करणे | ५.०० |
| | | अमरावती | २ | पॅराडाईज कॉलनी मस्जिद खिजरा पासुन जमिल भाई टिचर यांच्या घरापासुन ते बाबा जगर ट्रान्सपोर्ट पर्यंत रस्त्याचे कॉंक्रीटीकरण करणे | ४०.०० |
| | | अमरावती | ३ | अबुबकर कॉलनी सर्वे नं.६१/१ वलगांव रोड येथील अरहानीया मेडीकल, वलगांव रोड ते आगाईया बशीरीया सुफीया एज्युकेशन वेलफेअर सोसायटी अबुबकर कॉलनी पर्यंत ३०० मी. रोड डांबरीकरण करणे | १४.०० |
| | | अमरावती | ४ | अराफत कॉलनी येथील नाजीम सर यांच्या घरापासुन ते जिया साहब यांच्या घरापर्यंत नाली बांधणे | ११.०० |
| | | अमरावती | ५ | प्र.क्र.१६ रहेमत नगर येथे मुबारक यांचे घर ते राजु पठाण हाफीज साहब मिरचीवाले यांचे घरापर्यंत रोड कॉंक्रीट करणे | ३०.०० |
| | | चांदुरबाजार | ६ | चांदुरबाजार नगरपरिषद उर्दु विद्यालय जवळ इस्लामपुरा मोहल्ला येथील, प्रवेशद्वार व कॉंक्रीटीकरण करणे | १०.०० |
| | | चांदुरबाजार | ७ | नगर परिषद चांदुरबाजार हद्दीतील मुस्लीम कब्रस्तान संरक्षण भिंत व गेट चे बांधकाम करणे | ५.०० |
| | | अचलपूर | ८ | अचलपूर नगर परिषद हद्दीत वार्ड क्र.१५ हिरापूरा मुस्लीम कब्रस्थानला संरक्षण भिंत बांधणे व हायमास्ट लाईट लावणे | १०.०० |

| | | | | | |
|---|---|---|---|---|---|
| | | अचलपूर | ९ | अचलपूर न.प.वार्ड क्र.१४ फरमानपुरा येथे सैय्यद साहब दर्गाह च्या बाजूची विकास कामे करणे | १०.०० |
| | | अचलपूर | १० | अचलपूर न.प.वार्ड क्र.१९ जौगीपुरा येथे मस्जीद समोर खुल्या जागेत सभागृहाचे बांधकाम करणे | १०.०० |
| | | | | **जिल्हा अमरावती एकूण** | **१४५.००** |
| २ | अहमदनगर | अहमदनगर | ११ | अहमदनगर मनपा हद्दीतील प्रभाग क्र.१३ मधील दर्गाह दायरा शहा शरीफ जहाँगीरदार कब्रस्तान येथे संरक्षण भिंत बांधणे व विकसित करणे | ७५.०० |
| | | अहमदनगर | १२ | अहमदनगर मनपा हद्दीतील प्रभाग क्र. १० मधील १२ इमाम दर्गाह परिसरात पायाभूत सुविधा पुविणे | २५.०० |
| | | नेवासा | १३ | नेवासा नगरपंचायत हद्दीतील मौजे नेवासा (खुर्द) गट नं.३५६/१/२ येथे इदगाह बांधणे | ६०.०० |
| | | नेवासा | १४ | नेवासा नगरपंचायत हद्दीतील मौजे नेवासा (खुर्द) गट नं.१३/५ येथे गुरुद्वारा जवळ सुशोभिकरण करणे | १५.०० |
| | | नेवासा | १५ | नेवासा नगरपंचायत हद्दीतील मौजे नेवासा (खुर्द) गट नं.११३/१अ येथे अमोलिक चर्च परिसरात विकास कामे करणे | १५.०० |
| | | श्रीरामपुर | १६ | श्रीरामपुर शहरातील अल्पसंख्याक वस्तीमध्ये विविध विकास कामे करणे | ५०.०० |
| | | | | **जिल्हा अहमदनगर एकूण** | **२४०.००** |
| ३ | उस्मानाबाद | परंडा | १७ | परंडा शहरातील अल्पसंख्याक वस्तीमध्ये विविध विकास कामे करणे | ५०.०० |
| | | | | **जिल्हा उस्मानाबाद एकूण** | **५०.००** |
| ४ | औरंगाबाद | वैजापुर | १८ | वैजापुर तालुक्यातील अल्पसंख्याक वस्तीमध्ये विविध विकास कामे करणे | ५०.०० |
| | | औरंगाबाद | १९ | उर्स मैदान दरगाह हजरत शाह अब्दूल रज्जाक हुसैनी दरगाह बाबा शरफुद्दीन मस्जिद औलिया ॲण्ड ईदगाह, रोझाबाग येथे सुशोभिकरण करणे | २५.०० |

| | | | | | |
|---|---|---|---|---|---|
| | | औरंगाबाद | २० | उर्स मैदान दरगाह हजरत शाह अब्दूल रज्जाक हुसैनी दरगाह बाबा शरफुद्दीन मस्जिद औलिया ॲण्ड ईदगाह, रोझाबाग येथे सिमेंट कॉंक्रीटीकरण करणे | २५.०० |
| | | औरंगाबाद | २१ | उर्स मैदान दरगाह हजरत शाह अब्दूल रज्जाक हुसैनी दरगाह बाबा शरफुद्दीन मस्जिद औलिया ॲण्ड ईदगाह, रोझाबाग येथे गट्टु व विद्युत लाईट बसविणे | २५.०० |
| | | औरंगाबाद | २२ | औरंगाबाद शहरातील अल्पसंख्याक वस्तीमधील विविध विकास कामे करणे | २५.०० |
| | | औरंगाबाद | २३ | मनपा वार्ड क्र.११५, सातारा गाव अंतर्गत अबरार कॉलनी येथे इंडियन हॉटेल पासून ते श्री. उस्मान पटेल यांच्या घरापर्यंत सिमेंट रस्त्याचे बांधकाम करणे | २५.०० |
| | | औरंगाबाद | २४ | मनपा वार्ड क्र.११५, सातारा गाव अंतर्गत द्वारकानगर येथे शनि मंदिर पासून जुगनु मंजिल पर्यंत सिमेंट रस्त्याचे बांधकाम करणे | २५.०० |
| | | | | **जिल्हा औरंगाबाद एकूण** | **२००.००** |
| ५ | कोल्हापूर | शिरोळ | २५ | शिरोळ येथील अल्पसंख्याक वस्तीमध्ये नागरी विकास कामे करणे | ३४.०० |
| | | कोल्हापूर | २६ | कोल्हापूर महानगर पालिका प्रभाग क्र.१६ शिवाजी पार्क अंतर्गत अल्पसंखाक बहुल वस्त्यांमध्ये रस्ते डांबरीकरण व कॉंक्रीटीकरण करणे, पेव्हर ब्लॉक बसविणे, गटार करणे, सामाजिक सभागृह बांधणे, बाग-बगीचे सुधारणा करणे, क्रिडांगण सुधारणा, ओपन जिम बसविणे, खेळणी बसविणे, पथदिवे लावणे, हायमास्ट दिवे बसविणे, कब्रस्तान सुधारणा. इ कामे करणे | १०.०० |

| | | | | | |
|---|---|---|---|---|---|
| | | कोल्हापूर | २७ | कोल्हापूर महानगर पालिका प्रभाग क्र.२८ सिध्दार्थ नगर अंतर्गत अल्पसंखाक बहुल वस्त्यांमध्ये रस्ते डांबरीकरण व कॉंक्रीटीकरण करणे, पेव्हर ब्लॉक बसविणे, गटार करणे, सामाजिक सभागृह बांधणे, बाग-बगीचे सुधारणा करणे, क्रिडांगण सुधारणा, ओपन जिम बसविणे, खेळणी बसविणे, पथदिवे लावणे, हायमास्ट दिवे बसविणे, कब्रस्तान सुधारणा. इ कामे करणे | १०.०० |
| | | कोल्हापूर | २८ | कोल्हापूर महानगर पालिका प्रभाग क्र.२९ शिपुगडे तालीम अंतर्गत अल्पसंखाक बहुल वस्त्यांमध्ये रस्ते डांबरीकरण व कॉंक्रीटीकरण करणे, पेव्हर ब्लॉक बसविणे, गटार करणे, सामाजिक सभागृह बांधणे, बाग-बगीचे सुधारणा करणे, क्रिडांगण सुधारणा, ओपन जिम बसविणे, खेळणी बसविणे, पथदिवे लावणे, हायमास्ट दिवे बसविणे, कब्रस्तान सुधारणा. इ कामे करणे | ५.०० |
| | | कोल्हापूर | २९ | कोल्हापुर शहरातील दक्षिण भागातील अल्पसंख्याक वस्तीमध्ये विविध विकास कामे करणे | १००.०० |
| | | हातकणंगले | ३० | पेठ वडगांव येथे ईदगाह मैदानमध्ये लोखंडी शेड व संरक्षण भिंत बांधणे | २५.०० |
| | | हातकणंगले | ३१ | पेठ वडगांव येथे ईदगाह मध्ये ओटा बांधणे व अंतर्गत रस्ते तयार करणे | २५.०० |
| | | जत | ३२ | अबू शेर घर ते बबलू शिकलगार ट्रीमिक्स रस्ता करणे | १०.०० |
| | | जत | ३३ | सर्फराज नदाफ घर ते ताजुद्दीन जमखंडी घरापर्यंत डांबरी रस्ता करणे | १०.०० |
| | | जत | ३४ | राजू मुल्ला घर ते गफूर नाईक घर डांबरी रस्ता व गटार करणे | १०.०० |
| | | जत | ३५ | मुसाभाई शेख घर ते कमाल इनामदार घर डांबरी रस्ता करणे | १०.०० |

| | | | | | |
|---|---|---|---|---|---|
| | | जत | ३६ | दाऊद नदाफ घर ते मुन्ना शेख घरापर्यंत डांबरी रस्ता करणे | १०.०० |
| | | भुदरगड/ राधानगरी | ३७ | भुदरगड/ राधानगरी येथील नागरी अल्पसंख्याक वस्तीमध्ये विविध विकास कामे करणे | २५.०० |
| | | जयसिंगपूर | ३८ | जयसिंगपूर येथील मादनाईक मळा जैन मंदिर परिसर सुधारणा करणे. | १५.०० |
| | | जयसिंगपूर | ३९ | जयसिंगपूर येथील काडगे मळा जैन मंदिर परिसर सुधारणा करणे. | १०.०० |
| | | जयसिंगपूर | ४० | जयसिंगपूर येथील शाहूनगरजैन बस्ती परिसर सुधारणा करणे | १०.०० |
| | | शिरोळ | ४१ | शिरोळ येथील जैन बस्ती येथे भक्त निवास बांधणे व परिसरात विकास कामे करणे. | १५.०० |
| | | जयसिंगपूर | ४२ | जयसिंगपूर येथील यशवंत हौसींग सोसायटी नवीन कोर्टालगतचा रस्ता खडीकरण व डांबरीकरण करणे. | १०.०० |
| | | जयसिंगपूर | ४३ | जयसिंगपूर येथील ए.जी.चर्च परिसर सभोवताली संरक्षक भिंत बांधणे. | १०.०० |
| | | | | **जिल्हा कोल्हापूर एकूण** | **३५४.००** |
| ६ | गोंदिया | सडक अर्जुनी | ४४ | सडक अर्जुनी येथील कब्रस्तानमध्ये खडीकरण व सिमेंटीकरण करणे | १०.०० |
| | | सडक अर्जुनी | ४५ | सडक अर्जुनी येथील कब्रस्तानमध्ये नाली बांधकाम करणे व हायमास्ट लाईट बसविणे | ७.०० |
| | | अर्जुनी मोरगाव | ४६ | अर्जुनी मोरगाव येथील कब्रस्तानमध्ये सिमेंट रोड बांधणे | १०.०० |
| | | आमगाव | ४७ | आमगाव मुस्लिम कब्रस्तानात सुरक्षा भिंत बांधणे | १०.०० |
| | | आमगाव | ४८ | आमगाव मुस्लिम कब्रस्तानात पेव्हर ब्लॉक बसविणे | ५.०० |
| | | गोंदिया | ४९ | गोंदिया शहरातील प्रभाग क्र. २ येथील इदगाह संरक्षण भिंत बांधणे | १५.०० |
| | | | | **जिल्हा गोंदिया एकूण** | **५७.००** |
| ७ | चंद्रपूर | ब्रम्हपुरी | ५० | ब्रम्हपुरी शहरातील अल्पसंख्याक वस्तीमध्ये विविध विकास कामे करणे | ५०.०० |

| | | | | | |
|---|---|---|---|---|---|
| | | गोंडपिंपरी | ५१ | गोंडपिंपरी येथील कब्रस्तानास संरक्षण भिंत बांधणे | २०.०० |
| | | चंद्रपूर | ५२ | चंद्रपूर येथील नागरी अल्पसंख्याक वस्तीमध्ये विविध विकास कामे करणे | १००.०० |
| | | | | **जिल्हा चंद्रपूर एकूण** | **१७०.००** |
| ८ | जळगाव | अंमळनेर | ५३ | अंमळनेर न. प. हद्दीत बंगाली फाईल भागात सामाजिक सभागृह बांधणे | २०.०० |
| | | अंमळनेर | ५४ | अंमळनेर न. प. हद्दीत जापान जिन भागात सामाजिक सभागृह बांधणे | १५.०० |
| | | अंमळनेर | ५५ | अंमळनेर न. प. हद्दीत खारोट कब्रस्तान येथे संरक्षण भिंत बांधणे | १५.०० |
| | | जळगाव | ५६ | नशिराबाद येथे शादीखाना बांधकाम करणे | २५.०० |
| | | जळगाव | ५७ | नशिराबाद येथील मुस्लिम कब्रस्थानाला प्रवेशद्वार व संरक्षण भिंत बांधकाम करणे | २५.०० |
| | | एरंडोल | ५८ | एरंडोल येथील अल्पसंख्याक वस्तीमध्ये विविध विकास कामे करणे | ५०.०० |
| | | यावल | ५९ | यावल येथे चोपडा रोड वरील मुस्लीम दफनभुमी येथे संरक्षक भिंत बांधणे | २५.०० |
| | | मुक्ताईनगर | ६० | मुक्ताईनगर मधील अल्पसंख्याक वस्तीमध्ये विविध विकास कामे करणे | ५०.०० |
| | | मुक्ताईनगर | ६१ | नगर पंचायत बोदवड येथे गट नं.४२४ मध्ये शादीखाना हॉल बांधकाम करणे. | १००.०० |
| | | मुक्ताईनगर | ६२ | नगर पंचायत मुक्ताईनगर येथे गट नं. ७१४ मध्ये शादीखाना हॉल बांधकाम करणे. | १००.०० |
| | | चाळीसगांव | ६३ | चाळीसगांव न.प. येथील मेहुणबारे येथे वार्ड क्र.४ मध्ये पेव्हर ब्लॉक बसविणे. | १०.०० |
| | | चाळीसगांव | ६४ | चाळीसगांव न.प. येथील मेहुणबारे येथे वार्ड क्र.४ मध्ये बंदीस्त गटारीचे बांधकाम करणे | १०.०० |
| | | चाळीसगांव | ६५ | चाळीसगांव न.प. येथील मेहुणबारे येथे वार्ड क्र.५ मध्ये पेव्हर ब्लॉक बसविणे. | १०.०० |
| | | | | **जिल्हा जळगाव एकूण** | **४५५.००** |

| | | | | | |
|---|---|---|---|---|---|
| ९ | जालना | जालना | ६६ | जालना नगर परिषद हद्दतील सदर बाजार ईदगाह कब्रस्तान येथे संरक्षण भिंतीचे बांधकाम करणे | ४०.०० |
| | | जालना | ६७ | जालना नगर परिषद हद्दीतील सदर बाजार ईदगाह कब्रस्तान येथे विद्युत पोलची उभारणी करुन एल. ई.डी. लाईट बसविणे | २०.०० |
| | | जालना | ६८ | जालना नगर परिषद हद्दीतील बिलाल मस्जिद ते विनीत सहानी यांच्या हॉटेल पर्यंत भूमीगत गटारीचे बांधकाम करणे | १०.०० |
| | | जालना | ६९ | जालना नगर परिषद हद्दीतील सदर बाजार जैन मंदिर ते बैदपुरा मस्जिद व्हाया फुलबाजार पर्यंत सी.सी.रस्ता ट्रिमिक्स पध्दतीने तयार करणे | २०.०० |
| | | जालना | ७० | जालना नगर परिषद हद्दीतील मोहिनी ड्रेसेस ते काजीपुरा मस्जिद व्हाया नाला पर्यंत भूमीगत गटारीचे बांधकाम करणे | १०.०० |
| | | मंठा | ७१ | ऊर्दु मदरसा, जालना रोड येथे शादीखाना बांधणे | २५.०० |
| | | जालना | ७२ | मौजे मंठा ता. जालना येथे वार्ड क्र. ३, ४ फैल वसाहत येथे शादीखना बांधकाम करणे. | १०.०० |
| | | | | **जिल्हा जालना एकूण** | **१३५.००** |
| १० | ठाणे | ठाणे | ७३ | मुंब्रा येथे कम्युनिटी हॉल व अनुषंगिक कामे | २००.०० |
| | | ठाणे | ७४ | मुंब्रा कळवा येथे अल्पसंख्याक बहुल वस्तीत शादीखाना बांधणे | २००.०० |
| | | ठाणे | ७५ | प्रभाग क्र.२९ ब, ठाणे मनपा येथील सनागार्डन आणि जीलानी पार्क लगत पायवाट करणे | ५०.०० |
| | | ठाणे | ७६ | प्रभाग क्र.२९ ब, ठाणे मनपा येथील तिहामा आणि सैजादी, आशीयाना ते युनायटेड टॉवर लगत पायवाट करणे | ७५.०० |

| | | | | | |
|---|---|---|---|---|---|
| | | ठाणे | ७७ | प्रभाग क्र.३२ ब, ठाणे मनपा येथील कौसा भागातील अल्पसंख्याक वस्तीतील नाल्याची पुनर्बांधणी करणे | २००.०० |
| | | ठाणे | ७८ | प्रभाग क्र.३३ क, ठाणे मनपा येथील देवरीपाडा परिसरात रस्ते व गटार बांधणे | ५०.०० |
| | | ठाणे | ७९ | प्रभाग क्र.३३ क, ठाणे मनपा येथील रशीद कंपाऊंड परिसरात रस्ते व गटार बांधणे | ५०.०० |
| | | ठाणे | ८० | प्रभाग क्र.३३ क, ठाणे मनपा येथील साद चाल दानिश चाल, अस्पी चाल परिसरात रस्ते व गटार बांधणे | ५०.०० |
| | | ठाणे | ८१ | प्र.क्र.३१ (अ) मधील सम्राट नगर, मुख्य रस्त्याचे रफिक टेलर यांच्या दुकानापासुन ते रशीद शेख यांच्या घरापासुन ते सातापिर बिल्डिंग पर्यंत रस्त्याचे कॉंक्रीटीकरण व खालिद अब्दुल रज्जाक यांच्या घराजवळील शौचालयाची दुरुस्ती करणे | १५०.०० |
| | | ठाणे | ८२ | मुंब्रा प्रभाग समिती अंतर्गत प्र.क्र.३० (ब) मधील ॲलाईड बिल्डिंग परिसरात गटार व पायवाट करणे | २५.०० |
| | | ठाणे | ८३ | मुंब्रा प्रभाग समिती अंतर्गत प्र.क्र.३० (ब) मधील शौकत मंझिज परिसरात गटार व पायवाट करणे | २५.०० |
| | | ठाणे | ८४ | प्र.क्र.३१ (ब) मधील शिया मस्जिद ते सिकंदर दुकानापर्यंत गटर आणि पायवाट बनविणे | ५०.०० |
| | | ठाणे | ८५ | प्र.क्र.३१ (ब) मधील अमन ओ अमन सोसायटी येथील सी.सी. पायवाट बनविणे | ७५.०० |
| | | ठाणे | ८६ | प्र.क्र.३१ (ब) मधील गौसिया मस्जिद समोरील गटर व पायवाट करणे | ३०.०० |
| | | ठाणे | ८७ | मुंब्रा प्रभाग समिती अंतर्गत प्र.क्र.३० (क) मधील गंगाराम हॉटेल परिसरात अल्पसंख्याक वस्तीमध्ये गटार व पायवाट करणे | ५०.०० |

| | | | | | |
|---|---|---|---|---|---|
| | | ठाणे | ८८ | मुंब्रा प्रभाग समिती अंतर्गत प्र.क्र.३० (क) मधील श्रीयान रेसिडेन्सी परिसरात अल्पसंख्याक वस्तीमध्ये गटार व पायवाट करणे | ५०.०० |
| | | ठाणे | ८९ | मुंब्रा प्रभाग समिती अंतर्गत प्र.क्र.३० (क) मधील विविध ठिकाणी अल्पसंख्याक वस्तीमध्ये गटार व पायवाट करणे | २५.०० |
| | | ठाणे | ९० | कळवा, मनिषनगर येथे कब्रस्थान विकास कामे करणे | २००.०० |
| | | ठाणे | ९१ | प्र.क्र.२९ मध्ये अमरीश पार्क इमारत परिसरात गटारे व कॉंक्रीटीकरण करणे | २५.०० |
| | | ठाणे | ९२ | प्र.क्र.२९ मध्ये नौशाद पार्क इमारत परिसरात गटारे व कॉंक्रीटीकरण करणे | ५०.०० |
| | | ठाणे | ९३ | प्र.क्र.३० मध्ये बागे रहेमत परिसरात गटारे व पायवाटा करणे | ५०.०० |
| | | ठाणे | ९४ | प्र.क्र.३० मध्ये सिध्दिकी बाग परिसरात गटारे व पायवाटा करणे | २५.०० |
| | | ठाणे | ९५ | ठाणे मनपा क्षेत्रातील प्रभाग क्र.१५ मधील रूपादेवी टेकडी येथील जामा मस्जिद परिसरात अल्पसंख्याक वस्तीमध्ये गटार व पायवाटांची कामे करणे | ५०.०० |
| | | ठाणे | ९६ | ठाणे मनपा क्षेत्रातील प्रभाग क्र.१५ मधील आंबेवाडी व मस्जिद परिसरातील अल्पसंख्याक वस्तीमध्ये अस्तित्वातील शौचालयांचे नुतनीकरण करणे | २०.०० |
| | | ठाणे | ९७ | ठाणे मनपा क्षेत्रातील प्रभाग क्र.१५ मधील आंबेवाडी मार्केट व अंतर्गत भागातील अल्पसंख्याक वस्तीमधील जलवाहिन्या टाकणे | १५.०० |
| | | ठाणे | ९८ | ठाणे मनपा क्षेत्रातील प्रभाग क्र.१५ मधील आंबेवाडी मार्केट जवळील मस्जिद शेजारील व कब्रस्तान शेजारील विहिरींची पुनर्बांधणी करणे | १५.०० |
| | | अंबरनाथ | ९९ | अंबरनाथ येथील अल्पसंख्याक वस्तीमध्ये विविध विकास कामे करणे | १००.०० |

| | | | | | |
|---|---|---|---|---|---|
| | | कल्याण | १०० | प्रभाग क्र. ६ वडवली गावातील मस्जिद जवळील परिसरात गटार व पायवाटा बनविणे व पाटील नगर परिसरातील इराणी वस्ती (अल्पसंख्याक वस्तीतील) परिसरात गटार व पायवाटा बनविणे | १२.०० |
| | | कल्याण | १०१ | प्रभाग क्र. ७ आंबिवली गावठाण येथील खारी आंबिवली भागातील व अटाळी भागातील अल्पसंख्याक वस्तीतील गटारे व सिमेंट कॉंक्रीटचे रस्ते बनविणे | १२.०० |
| | | कल्याण | १०२ | प्रभाग क्र. ८ मांडा (प.) येथील अल्पसंख्याक वस्तीतील अंतर्गत सिमेंट कॉंक्रीटचे रस्ते बनविणे | १३.०० |
| | | कल्याण | १०३ | प्रभाग क्र.११ बल्याणी गावातील अल्पसंख्याक वस्तीत सिमेंट कॉंक्रीटचे रस्ते बसविणे | १३.०० |
| | | कल्याण | १०४ | प्रभाग क्र.३२ सिध्देश्वर आळी नमक बंद रोड ते जामा मस्जिद हा अल्पसंख्याक वस्तीतील रस्ता कॉंक्रीटीकरण करणे | १०.०० |
| | | कल्याण | १०५ | प्रभाग क्र.३३ गफूर डोन चौक अन्सारी चौक ते गफुर डोन चौक पर्यंत अल्पसंख्याक वस्तीतील रस्ता कॉंक्रीटीकरण करणे | १०.०० |
| | | कल्याण | १०६ | प्रभाग क्र.३४ गोविंदवाडी नाज बिल्डींग परिसर व गोंविंदवाडी शौचालय परिसरात अल्पसंख्याक वस्तीतील पायवाटा बनविणे | १०.०० |
| | | कल्याण | १०७ | प्रभाग क्र.३५ रोहिदास वाडा येथील उर्दू मुस्लिम स्कुल भोईर चाळ परिसरात पायवाट व गटार बनविणे | १०.०० |
| | | कल्याण | १०८ | प्रभाग क्र.३८ रामबाग सिंडीकेट इराणी चाळ आतिष खान कंपाउंड नेहरु नगर परिसरात अल्पसंख्याक वस्तीमध्ये पायवाटा व गटारे बनविणे | १०.०० |
| | | ठाणे | १०९ | ओवळा-माजीवाडा, ठाणे येथील अल्पसंख्याक वस्तीमध्ये विविध विकास कामे करणे | १००.०० |

| | | | | | |
|---|---|---|---|---|---|
| | | भिवंडी | ११० | मेहबुबीयानगर कब्रस्थान, नवीबस्ती, भिवंडी याठिकाणी पत्राशेड रिटेनींग भिंत, पथदिवे, कब्रस्थानसाठी लाल माती पुरविणे व पेव्हर ब्लॉक बसविणे व इतर बांधकाम करणे | ४०.०० |
| | | भिवंडी | १११ | चिस्तीया कब्रस्थान, बाबा हॉटेल जवळ, भिवंडी या ठिकाणी रिटेनींग भिंत, पेव्हर ब्लॉक बसविणे व इतर बांधकाम करणे | ६०.०० |
| | | ठाणे | ११२ | अल्पसंख्याक वस्तीत रामत्रीक बिल्डिंग समोर रोड आणि गटार दुरुस्ती | २५.०० |
| | | ठाणे | ११३ | म्युनीस कंपाऊंड साईनाथ चाळ समोर आणि सुन्नी मस्जिदच्या बाजुचे शौचालय दुरुस्ती करणे | १०.०० |
| | | ठाणे | ११४ | मक्का हाऊस च्या समोरील गटार दुरुस्ती करणे | १०.०० |
| | | ठाणे | ११५ | अल्पसंख्याक वस्तीतील ग्रीन कॉम्प्लेक्स बी एम सी च्या जुन्या गटाराला मेन गटार जोडणे | १०.०० |
| | | ठाणे | ११६ | सुन्नी मस्जिद च्या बाजुच्या गटारावर स्लॅब टाकणे व अल्पसंख्याक वस्तीतील अमर पेलेस च्या ब्रीज खाली नवीन शौचालय निर्माण करणे. | १५.०० |
| | | ठाणे | ११७ | अमर पॅलेस ते मीरा गाव पर्यंत अल्पसंख्याक वस्तीत R.C.C. रोड बनविणे. तसेच अमर पॅलेस ते छत्रपती शिवाजी महाराज चौक पर्यंत रोड दुरुस्ती करणे | १५.०० |
| | | ठाणे | ११८ | पीर गौर शहा बाबा दर्गाजवळ R.C.C. रोड बनविणे | १५.०० |
| | | नवी मुंबई | ११९ | नवी मुंबई महानगरपालिका खैरणे परिसरातील तलावाच्या भोवती बसण्यासाठी लाकडी बाकडे व इतर सोयी-सुविधा करणे. | १०.०० |
| | | भिवंडी | १२० | भिवंडी महानगरपालिका, वार्ड क्रमांक २० ब येथून शिवाजीनगर येथे पेव्हर ब्लॉक बसविणे. | १०.०० |

| | | | | | |
|---|---|---|---|---|---|
| | | भिवंडी | १२१ | भिवंडी निजामपूर शहर महानगरपालिका वॉर्ड क्र.१० क येथील अन्सारनगर, बंन्दा नवाज मस्जीद परिसरात व विविध ठिकाणी गटार, पथवेज व ब्लॉक बसविणे. | १५.०० |
| | | ठाणे | १२२ | ठाणे म.न.पा. अंतर्गत मुंब्रा येथील बोहरी कब्रस्तान ते मित्तल रोड पर्यंतचा रस्ता बनविणे. | १०००.०० |
| | | भिवंडी | १२३ | भिवंडी निजामपूर म.न.पा. हद्दीतील वॉर्ड क्र.२ मिल्लत नगर येथील आरक्षण क्र.४९ येथील उद्यान विकसित करणे. | २००.०० |
| | | भिवंडी | १२४ | भिवंडी निजामपूर म.न.पा. हद्दीतील वॉर्ड क्र.१ अंतर्गत फातमानगर अल्पसंख्याक वस्तीकरीता पोहच रस्ता विकसित करणे. | १५०.०० |
| | | भिवंडी | १२५ | भिवंडी निजामपूर म.न.पा. हद्दीतील वॉर्ड क्र.१ येथील नूर ट्रेडिंग व निसान हॉटेल ते कब्रस्तान पर्यंत गटार, पथदिवे व स्ट्रिटलाईट बसविणे. | २०.०० |
| | | भिवंडी | १२६ | भिवंडी निजामपूर म.न.पा. हद्दीतील वार्ड क्र.१ येथील रजा मस्जिद परिसरामध्ये गटार, पाथवेज व स्ट्रीट लाईट बसविणे | २०.०० |
| | | भिवंडी | १२७ | भिवंडी निजामपूर म.न.पा. हद्दीतील वार्ड क्र.१ पांजरापोळ कब्रस्तान येथे शेड तयार करणे व विकास कामे करणे. | ४०.०० |
| | | भिवंडी | १२८ | भिवंडी निजामपूर म.न.पा. हद्दीतील वार्ड क्र.२ रिवेरा पाम सोसायटी ते न्यु फरिद बाग व मिल्लत नगर परिसरात व इतर ठिकाणी गटार तयार करणे. | ५०.०० |
| | | भिवंडी | १२९ | भिवंडी निजामपूर म.न.पा. हद्दीतील वार्ड क्र.१४ गैबीनगर  कब्रस्तान येथे विकास कामे करणे. | २०.०० |
| | | | | **जिल्ह ठाणे एकूण** | **३८४०.००** |
| ११ | धुळे | साक्री | १३० | मौजे साक्री शहरातील दफनभुमीत बैठक व्यवस्थेसाठी शेड उभारणे | १०.०० |

| | | | | | |
|---|---|---|---|---|---|
| | | धुळे | १३१ | धुळे म.न.पा. हद्दीतील जलाल शाह कब्रस्तान मध्ये रस्ते तयार करणे व पथदिवे लावणे | ३०.०० |
| | | धुळे | १३२ | धुळे म.न.पा. हद्दीतील मोगलाई कब्रस्तान मध्ये रस्ते तयार करणे व पथदिवे लावणे | ४०.०० |
| | | | | **जिल्हा धुळे एकूण** | **८०.००** |
| १२ | नंदूरबार | अक्कलकुवा | १३३ | मक्राणीफळी येथे सोलार स्ट्रीट लाईट बसविणे | ३.२० |
| | | अक्कलकुवा | १३४ | जामा मस्जिद जवळ सोलार स्ट्रीट लाईट बसविणे | ३.२० |
| | | अक्कलकुवा | १३५ | खाटकी मोहल्ला येथे सोलार स्ट्रीट लाईट बसविणे | ३.२० |
| | | अक्कलकुवा | १३६ | जमादरफळी येथे सोलार स्ट्रीट लाईट बसविणे | ३.२० |
| | | अक्कलकुवा | १३७ | मदिनापार्क येथे सोलार स्ट्रीट लाईट बसविणे | ३.२० |
| | | अक्कलकुवा | १३८ | कुरेशी मोहल्ला येथे सोलार स्ट्रीट लाईट बसविणे | ३.०० |
| | | अक्कलकुवा | १३९ | मिठा मुस्लिम वस्ती येथे येथे सोलार स्ट्रीट लाईट बसविणे | ३.०० |
| | | नवापूर | १४० | नवापूर येथे मोठी कब्रस्तानमध्ये ट्युब्युलर पोलवर LED लाईट बसविणे. | १०.०० |
| | | नवापूर | १४१ | नवापूर येथे ईदगाह कब्रस्तानमध्ये ट्युब्युलर पोलवर LED लाईट बसविणे. | १०.०० |
| | | | | **जिल्हा धुळे एकूण** | **४२.००** |
| १३ | नांदेड | नांदेड | १४२ | नांदेड शहरातील अल्पसंख्याक वस्तीमध्ये विविध विकास कामे करणे | ५०.०० |
| | | भोकर | १४३ | भोकर शहरातील इदगाह मैदान परिसर सुधारणा करणे | ५०.०० |
| | | नांदेड | १४४ | गुरुद्वारा गेट नं. २ एन आर आय यात्री निवास पासून ते हरविंदरसिंघ हजुरीया यांच्या घरापर्यंत सीसी रस्ता व आरसीसी नाली करणे | ५०.०० |

| | | | | | |
|---|---|---|---|---|---|
| | | नांदेड | १४५ | गुरुद्वारा गेट नं.३ निर्मले नगर भागातील जसबीरसिंघ शाहु यांच्या घरापासून ते नवरत्न सिंघ गाडीवाले यांच्या घरापर्यंत सीसी रस्ता व आरसी सी नाला बनवणे | ५०.०० |
| | | नांदेड | १४६ | नांदेड जिल्ह्यातील अल्पसंख्याक नागरी वस्तीमध्ये विविध विकास कामे करणे | २५.०० |
| | | नांदेड | १४७ | नांदेड येथील खडकपूरा प्रभाग येथील कब्रस्तानला सुरक्षा भिंत बांधणे व कब्रस्तानकडे जाणारा पक्का रस्ता बांधणे | १०.०० |
| | | | | **जिल्हा नांदेड एकूण** | **२३५.००** |
| १४ | नागपूर | नागपूर | १४८ | नागपूर उत्तर भागातील अल्पसंख्याक वस्तीमध्ये विविध विकास कामे करणे | १००.०० |
| | | सावनेर | १४९ | सावनेर ख्रिश्चन दफनभुमी ला संरक्षण भिंत बांधकाम | ३०.०० |
| | | उमरेड | १५० | उमरेड शहरातील अल्पसंख्याक वस्तीमध्ये विविध विकास कामे करणे | ५०.०० |
| | | नागपूर | १५१ | प्रभाग क्र.१०, सादीका बाद येथे संरक्षण भिंतीचे बांधकाम करणे | ३०.०० |
| | | नागपूर | १५२ | प्रभाग क्र.१०, अवस्थी नगर येथे अल्पसंख्याक वस्तीमध्ये रस्त्याचे कडेला आयब्लॉक लावणे | ४०.०० |
| | | नागपूर | १५३ | प्रभाग क्र.११, ईदगाह मैदान जाफर नगर येथे विविध स्थापत्य कामे करणे | ३०.०० |
| | | नागपूर | १५४ | रामटेक येथील नागरी अल्पसंख्याक वस्तीमध्ये विविध विकास कामे करणे | ५०.०० |
| | | नागपूर | १५५ | नागपूर महानगरपालिका प्रभाग क्र. ८, मोमिनपुरा येथे रस्ते काँक्रीटीकरण करणे. | १०.०० |
| | | | | **जिल्हा नागपूर एकूण** | ३४०.०० |
| १५ | नाशिक | पेठ | १५६ | पेठ येथे शादीखाना बांधणे | १००.०० |
| | | निफाड | १५७ | ओझर मिग येथे कब्रस्तानला संरक्षण भिंत बांधणे | २५.०० |
| | | नाशिक | १५८ | देवळाली कॅम्प येथील मुस्लिम कब्रस्तानास संरक्षण भिंत बांधणे | ४०.०० |

| | | | | | |
|---|---|---|---|---|---|
| | | कळवण | १५९ | कळवण नगरपंचायत हद्दीतील कब्रस्तान विकसित करणे | ३५.०० |
| | | सिन्नर | १६० | सिन्नर तालुक्यातील अल्पसंख्याक वस्तीतील विविध विकास कामे करणे | ३०.०० |
| | | मालेगाव | १६१ | द्याने रमजानपुरा येथील अल्पसंख्याक वस्तीत ठिकठिकाणी कॉंक्रीट रस्ते व गटार करणे | ५०.०० |
| | | नांदगाव | १६२ | मनमाड नगरपरिषद हद्दीत शादीखाना बांधणे | ५०.०० |
| | | नांदगाव | १६३ | नांदगाव नगर परिषद हद्दीत शादीखाना बांधणे | ५०.०० |
| | | ईगतपूरी | १६४ | ईगतपुरी येथे आरो मस्जिद येथे शादीखाना बांधणे | ३०.०० |
| | | ईगतपूरी | १६५ | ईगतपूरी येथे कब्रस्तानमध्ये वजूखाना व टाकीसह शेड बनविणे | १५.०० |
| | | पेठ | १६६ | पेठ येथील वार्ड क्र.१३ मध्ये रवि सोमवंशी ते शर्फु बाबा यांच्या घरापर्यंत रस्त्याच्या दोन्ही बाजुस पेव्हरब्लॉक बसविणे | १०.०० |
| | | पेठ | १६७ | पेठ येथील वार्ड क्र.१३ मध्ये मस्जिद परिसरात पेव्हरब्लॉक बसविणे | १०.०० |
| | | पेठ | १६८ | पेठ येथील वार्ड क्र.१३ मध्ये मस्जिद परिसरात सौर पथदिप बसविणे | ५.०० |
| | | मालेगाव | १६९ | मालेगाव मनपा अंतर्गत वार्ड क्र. १५ नयापूरा बडा कब्रस्तान येथे संरक्षण भिंत बांधणे, रस्ता कॉंक्रीटीकरण, पोलसह पथदिवे तसेच हायमास्ट दिवे लावणे | ७०.०० |
| | | मालेगाव | १७० | मालेगाव मनपा अंतर्गत वार्ड क्र. ६ मधील आयशा नगर कब्रस्तान येथे हॉल, रस्ता कॉंक्रीटीकरण करणे व पथ दिवे लावणे | ३०.०० |
| | | ईगतपुरी | १७१ | ईगतपुरी नगरपरिषद ता. ईगतपूरी येथील खालची पेठ जामा मस्जिद येथे शादीखाना बांधणे | १०.०० |
| | | नाशिक | १७२ | देवळाली कॅम्प येथील गुरुद्वाराच्या परिसरात विविध विकास कामे करणे | १०.०० |

| | | | | | |
|---|---|---|---|---|---|
| | | नाशिक | १७३ | देवळाली कॅम्प येथील गुरुद्वारा येथे हायमास दिवे बसविणे | ५.०० |
| | | नाशिक | १७४ | देवळाली कॅम्प येथील गुरुद्वाराच्या परिसरात निवारा शेड बांधणे | १०.०० |
| | | नाशिक | १७५ | नाशिक रोड येथील गुरुद्वाराच्या परिसरात विकास कामे करणे | २५.०० |
| | | मालेगाव | १७६ | मालेगाव येथील नयापुरा वार्ड स.नं.१०७ येथील कब्रस्थान अंतर्गत रस्ते व संरक्षण भिंत बांधणे | ४०.०० |
| | | मालेगाव | १७७ | मालेगाव येथील दरेगांव शिवार गट क्र.११४ येथील कब्रस्थान अंतर्गत रस्ते व संरक्षण भिंत बांधणे | ४०.०० |
| | | मालेगाव | १७८ | मालेगाव येथील आयशानगर कब्रस्तान येथे जनाजा हॉल बांधणे | २०.०० |
| | | | | **जिल्हा नाशिक एकूण** | **७१०.००** |
| १६ | परभणी | परभणी | १७९ | परभणी शहरातील प्रभाग क्र.१३ येथे धार रोड पासुन ते कब्रस्थान पर्यंत डांबरी रस्ता करणे | १५.०० |
| | | परभणी | १८० | परभणी शहरातील प्रभाग क्र.१४ काद्राबाद प्लॉट येथे काद्राबाद कब्रस्तानचे सुशोभिकरण करणे | १५.०० |
| | | परभणी | १८१ | परभणी शहरातील प्रभाग क्र.९ काद्राबाद प्लॉट येथील राज कब्रस्तानचे सुशोभिकरण करणे | १५.०० |
| | | परभणी | १८२ | परभणी शहरातील प्रभाग क्र.१५ मधील अखुंदशहा मिया कब्रस्तानचे सुशोभिकरण करणे | १५.०० |
| | | परभणी | १८३ | परभणी जिल्ह्यातील अल्पसंख्याक वस्तीमध्ये विकास कामे करणे | २५.०० |
| | | गंगाखेड | १८४ | गंगाखेड येथे शादीखाना बांधकाम करणे | २५.०० |
| | | गंगाखेड | १८५ | गंगाखेड येथील शेख जीवन कब्रस्थान संरक्षण भिंत बांधकाम करणे | १०.०० |
| | | गंगाखेड | १८६ | गंगाखेड येथील तारू मोहल्ला कब्रस्थान संरक्षण भिंत बांधकाम करणे | १५.०० |

| | | | | | |
|---|---|---|---|---|---|
| | | मानवत | १८७ | मानवत न.प. प्रभाग क्र.०७ अंतर्गत गालीब नगर येथे आर.सी.सी. रोड करणे | २५.०० |
| | | मानवत | १८८ | मानवत न.प. प्रभाग क्र.०७ अंतर्गत गालीब नगर येथे आर.सी.सी. नाली बांधकाम करणे | २५.०० |
| | | गंगाखेड | १८९ | गंगाखेड येथील राज मोहल्ला येथे मरकज मस्जीद समोर हायमास्ट बसविणे प्र.क्र.४ | ५.०० |
| | | गंगाखेड | १९० | गंगाखेड येथील राज मोहल्ला कब्रस्थान येथे गेट, पाण्याचा हौद आणि विकास कामे करणे प्र.क्र.४ | ५.०० |
| | | परभणी | १९१ | परभणी म.न.पा. अंतर्गत प्रभाग क्र.१४ ब येथील काद्राबाद कब्रस्तान मधील नाला बांधकाम करणे. | २०.०० |
| | | परभणी | १९२ | परभणी म.न.पा. अंतर्गत प्रभाग क्र.१४ ब येथील काद्राबाद कब्रस्तानला सुरक्षा भिंत बांधणे. | २०.०० |
| | | परभणी | १९३ | परभणी म.न.पा. अंतर्गत प्रभाग क्र.१४ ब येथील काद्राबाद कब्रस्तान मस्जीद परीसर मधील पेव्हर ब्लॉक व सुशोभीकरण करणे. | १०.०० |
| | | पुर्णा | १९४ | पुर्णा न.प. अंतर्गत मस्तानपुरा प्र.क्र.०१ मध्ये गंगाधर परडे यांचे घर ते जैस्वाल यांचे घरापर्यंत आर.सी.सी. नालीचे बांधकाम करणे. | १२.०० |
| | | पुर्णा | १९५ | पुर्णा न.प. अंतर्गत मस्तानपुरा प्र.क्र.०१ मध्ये गंगाधर परडे यांचे घर ते जैस्वाल यांचे घरापर्यंत आर.सी.सी. रोडचे बांधकाम करणे. | १५.०० |
| | | परभणी | १९६ | परभणी महानगरपालिका अंतर्गत प्र.क्र.३ क मधील खदीरभाई यांचे घरापासून ते मुजम्मील काजी यांच्या घरापर्यंत पेव्हर ब्लॉक बसविणे. (२२० मी.) | २०.०० |
| | | परभणी | १९७ | परभणी महानगरपालिका अंतर्गत प्र.क्र.३ क मध्ये हायमास्ट लाईट बसविणे. | १०.०० |
| | | परभणी | १९८ | परभणी महानगरपालिका अंतर्गत प्र.क्र.९ मधील शाखीर पटेल यांच्या घरापासून ते पवार यांच्या घरापर्यंत सुशोभिकरण करणे. | ७.०० |

| | | | | | |
|---|---|---|---|---|---|
| | | पुर्णा | १९९ | पुर्णा न.प. अंतर्गत प्रभाग क्र.७ मध्ये ॲड. रशीद यांच्या घरापासून ते निजामोद्दीन दर्गा पर्यंत मुख्य एच.डी.एफ.सी. पाईप लाईन करणे. | १०.०० |
| | | पुर्णा | २०० | पुर्णा न.प. अंतर्गत प्रभाग क्र.०१ मस्तानपूरा येथे मस्जीद परीसरात नालीचे काम करणे. | १०.०० |
| | | पुर्णा | २०१ | पुर्णा न.प. अंतर्गत प्रभाग क्र.७ मध्ये संदिप जोगदंड ते कावशी नाल्यापर्यंत सी.सी.रोड व आर.सी.सी.नाली बांधकाम करणे. | १०.०० |
| | | | | **जिल्हा परभणी एकूण** | **३३९.००** |
| १७ | पालघर | डहाणू | २०२ | डहाणू येथील नागरी अल्पसंख्याक वस्तीमधील विविध विकास कामे करणे | ५०.०० |
| | | नालासोपारा | २०३ | नालासोपारा येथील नागरी अल्पसंख्याक वस्तीमध्ये विविध विकास कामे करणे | १००.०० |
| | | वसई | २०४ | वसई येथील नागरी अल्पसंख्याक वस्तीमध्ये विविध विकास कामे करणे | १००.०० |
| | | | | **जिल्हा पालघर एकूण** | **२५०.००** |
| १८ | पुणे | बारामती | २०५ | बारामती नगरपरिषद हद्दवाढ विकास आराखड्यातील तांदूळवाडी येथील कब्रस्तान विकसीत करणे | ५०.०० |
| | | बारामती | २०६ | बारामती नगरपरिषद हद्दवाढ विकास आराखड्यातील जळोची येथील कब्रस्तान विकसीत करणे | ५०.०० |
| | | बारामती | २०७ | बारामती नगरपरिषद हद्दवाढ विकास आराखड्यातील बारामती ग्रामीण येथील कब्रस्तान विकसीत करणे | ५०.०० |
| | | बारामती | २०८ | बारामती नगरपरिषद हद्दवाढ विकास आराखड्यातील रुई येथील कब्रस्तान विकसीत करणे | ५०.०० |
| | | बारामती | २०९ | मुस्लिम समाज बहुउद्देशीय सभागृह करणे | २००.०० |
| | | बारामती | २१० | प्रभाग क्र. १८ मधील जामा मस्जिद लगत परिसर विकसीत करणे | ५०.०० |
| | | बारामती | २११ | प्रभाग क्र. १२ मधील ख्रिस्ती उपासना मंदिर लगतचा परिसर विकसीत करणे | २५.०० |

